**महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी यांना सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात माहे जून २०१० ते डिसेंबर २०१० करिता योजनांतर्गत योजनेचे अनुदान मंजूर/ वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**शासन निर्णय क्रमांक : मफुकृवि-२०१०/प्र. क्र. ४९/८-अे**
**दिनांक : ६ डिसेंबर, २०१०.**

**वाचा :-** १) शासन निर्णय क्रमांक अंदाज-लेखानु-२०१०/प्र.क्र.४९/१०/२-अे, दिनांक ६ एप्रिल, २०१०.
२) शासन निर्णय क्रमांक : मफुकृवि-२०१०/प्र.क्र.४९/८-अे, दिनांक २२ एप्रिल, २०१०,
३) शासन निर्णय क्रमांक : अंदाज/कॅश फ्लो-२०१०/(प्र.क्र.५९/१०)/२-अे, दि. २१ मे, २०१०.

**शासन निर्णय :-**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी यांना सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षाकरिता "२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण" या मुख्य लेखाशीर्षाखाली "०१ पीक संवर्धन", (योजनांतर्गत) २४१५ ००७२ या उपशीर्षांतर्गत त्यांचे योजनांतर्गत योजना चालू ठेवण्यासाठी सन २०१०-२०११ करिता एकूण रुपये ४९९२९०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. यापैकी **रु. ८३,२२,०००/-** इतके लेखानुदान एप्रिल २०१० ते मे २०१० या कालावधीकरिता उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयाद्वारे वितरीत केले आहे. माहे जून २०१० ते डिसेंबर २०१० करिता महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी यांना खालील नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन **रु. १,६८,५६,३२४/-** (अक्षरी रुपये एक कोटी अडुसष्ट लाख छप्पन हजार तीनशे चोवीस फक्त) इतके अनुदान मंजूर करीत आहे. मंजूर केलेल्या अनुदानाचा योजनानिहाय तपशील सोबतच्या विवरणपत्रात नमूद केला आहे.

| अ.क्र. | उपलेखाशिर्ष/बाब | सन २०१०-११ करिता मंजूर तरतूद (रु.) | एप्रिल ते मे २०१० करिता वितरीत लेखानुदान (रु.) | जून २०१० ते डिसेंबर २०१० करिता वितरीत करावयाचे अनुदान. (रु.) |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| | ०१ पिक संवर्धन (योजनांतर्गत) २४१५ ००७२ | | | |
| १ | भारतीय कृषि अनुसंधान परिषद अर्थसहाय्यित योजनांसाठी शासनाचा २५ टक्के हिस्सा | ३३९६०००० | ५६६०००० | ६७४२३२४ |
| २ | डाळींब संशोधन केंद्र, लखमापूर, नाशिक | १५९६९००० | २६६२००० | १०११४००० |
| | **एकूण (१+२)** | **४९९२९०००** | **८३२२०००** | **१६८५६३२४** |

**अटी व शर्ती**

१) उपरोक्त मंजूर केलेल्या अनुदानाचा उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय आणि बाबनिहाय तपशील सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये नमूद केला आहे. विद्यापीठाने उपलेखाशिर्ष/गट/योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे/बाबी, योजनांतर्गत योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा. काही पदे रिक्त असल्यामुळे अथवा अन्य बाबी/कारणांमुळे एखाद्या योजनेखाली अनुदान अखर्चित राहील्यास, सदर अनुदान पुढील महिन्यामध्ये वितरीत करण्यात येणा-या अनुदानामध्ये समायोजित करावे. तथापि, सन २०१०-२०११ मध्ये उपलब्ध झालेले अर्थसंकल्पीय अनुदान मंजूर मासिक निधी वितरण विवरणपत्रानुसार खर्च करणे अनिवार्य राहील.

२) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/ शिल्लक राहीला/ राहणार असेल तर सदर अखर्चित/ शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी/योजनांसाठी/बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) उपलेखाशिर्षनिहाय मंजूर योजनांचे व त्या अंतर्गत मंजूर असलेल्या पदांचे सुधारित आकृतीबंधानुसार व्यवस्थितरित्या गटनिहाय वर्गीकरण केले आहे किंवा कसे याची कृषि परिषदेने/विद्यापीठाने सखोल तपासणी करावी. सदर वर्गीकरणामध्ये शासनाच्या मान्यतेशिवाय कोणतेही बदल करु नयेत.

४) प्रत्येक गटामधील वितरीत केलेले सहाय्यक अनुदान आणि महसूली उत्पन्न त्या गटातील अनुज्ञेय बाबींवरील ख़र्च भागविण्यासाठी आणि विकास कामे करण्यासाठी उपयोगात आणावे. एका गटाचे सहायक अनुदान आणि महासूली उत्पन्न दुस-या गटातील योजनां/बाबींसाठी वर्ग करु नये. एखाद्या गटातील योजनेसाठी जास्त सहायक अनुदान वितरीत झाले असेल तर, पुढील निधीची मागणी करताना सदर जास्तीचे अनुदान विचारात घेऊन तेवढ्या कमी व अनुज्ञेय निधीची मागणी करावी.

५) शासनाने मंजूर केलेल्या पदांपैकी जी पदे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदीप्रमाणे भरलेली आहेत व सदर पदे योजनेतर खर्चाने पुढे चालू ठेवण्यासाठी शासनाने मान्यता दिली आहे, अशा पदांच्या वेतन व भत्त्यांसाठीच विहीत अनुदान देय राहील.

६) प्रत्येक उपलेखाशीर्ष/ गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे/ हिशोब ठेवावेत.

७) ज्या योजनांतर्गत/योजनेतर योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनेतर/योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

८. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने विद्यापीठास मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश/ कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा

मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

९) शासनाने विद्यापीठाच्या काही नवीन योजनांना मान्यता देताना, सदर योजनेमधील पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करण्यास/भरण्यास मान्यता दिलेली आहे. यामुळे सदर नवीन योजनेसाठी नवीन पदे निर्माण झाल्यामुळे, ज्या योजनेतर/योजनांतर्गत मूळ योजनांमधील पदे अंतर्गत समायोजनाने नवीन योजनेकरिता वर्ग/ उपलब्ध केली असतील, त्या मूळ योजनांमधील पदांचे वेतन व भत्यासाठी या आदेशान्वये वितरीत केलेला निधी खर्च करु नये. तसेच तिमाही अनुदानाची मागणी करताना, अशा पदांचे वेतन व भत्त्यासाठी लागणा-या निधीची मागणी करु नये.

१०) कृषि विद्यापीठास त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

११) विद्यापीठास मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि **प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.**

१२) सन २०१०-२०११ मधील अनुदानाचा दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

१३) नियमबाह्य योजना, पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

१४) विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

१५) उप विभागीय कृषि अधिकारी, राहूरी यांनी वरीलप्रमाणे जून २०१० ते डिसेंबर २०१० करिता ०१-पीक संवर्धन (योजनांतर्गत) मंजूर करण्यात आलेले **रु. १,६८,५६,३२४/-** (अक्षरी रुपये एक कोटी अडुसष्ट लाख छप्पन्न हजार तीनशे चोवीस फक्त), इतके अनुदान मासिक निधी वितरण विवरणपत्राच्या मर्यादेत दरमहा नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

१६)	या प्रित्यर्थचा खर्च सन २०१०-२०११ च्या अंदाजपत्रकात खालील लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| | मंजूर अनुदान | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| १) | रु. १,६८,५६,३२४/- | मागणी क्रमांक डी-३<br>२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण<br>०१, पीक संवर्धन<br>१२०, इतर संस्थांना सहाय्य<br>१२०, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना<br>(००) (०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठास सहाय्यक अनुदान<br>३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर) दत्तमत (२४१५ ००७२) |

हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १६२ (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या आदेशानुसार व वित्त विभागाने मान्य केलेल्या अर्थसंकल्पीय अंदाज २०१०-२०११ अनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक **२०१०१२०६१९२५१२००१** आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(तु. कृ. पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, सर्व्हे नं. १३२/ब, भोसलेनगर, कै. विष्णूपंत कुशाबा भोसले पथ, पुणे-७ (३ प्रती)
कुलगुरु महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर,
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर,
नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जि. अहमदनगर (५ प्रती),
कृषि आयुक्त, (अेजी १० सेल) महाराष्ट्र राज्य, पुणे (खर्च ताळमेळ शाखा) (५ प्रती),
पशुसंवर्धन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
मत्स्यव्यवसाय आयुक्त, तारापोरवाला मत्स्यालय, मुंबई,
उपविभागीय कृषि अधिकारी, राहूरी, जि. अहमदनगर (३ प्रती),
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर (३ प्रती),
जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर (३ प्रती),
उपकोषागार अधिकारी, राहूरी, जिल्हा अहमदनगर,
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई (३ प्रती),
उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई (३ प्रती),
जिल्हा लेखा परिक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (३ प्रती),
वित्त विभाग (व्यय १/बियुडी १२),
कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक २अे/६अे/७अे, कृषि व पदुम विभाग, मुंबई ४०० ०३२,
निवडनस्ती.

**शासन निर्णय क्रमांक :मफुकृवि-२०१०/प्र.क्र.४९/८-अे, दिनांक ६ डिसेंबर, २०१० सोबतचे**

**विवरणपत्र 'अ'**

**०१ पिक संवर्धन (योजनांतर्गत योजना)**

**सन २०१०-११ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर अनुदान आणि माहे जून २०१० ते डिसेंबर २०१० करिता वितरीत करावयाचे अनुदान.**

**(योजनांतर्गत योजना)**

| अ. क्र. | योजनेचे नांव | सन २०१०-११ करिता मंजूर अनुदान | लेखा अनुदानान्वये माहे एप्रिल २०१० ते मे २०१० करिता वितरीत केलेले अनुदान. | माहे जून २०१० ते डिसेंबर २०१० करिता वितरीत करावयाचे अनुदान. |
|---|---|---|---|---|
| **१.** | **२.** | **३.** | **४.** | **५.** |
| १. | अ. भा. गहू सुधार प्रकल्प, निफाड | ९४४ | १५७ | १९६ |
| २. | अ. भा. गळीतधान्य (भुईमुग) सुधार प्रकल्प, जळगांव | ४२५ | ७१ | ८८ |
| ३. | अ. भा. केळी प्रकल्प, जळगांव | ९०० | १५० | १८७ |
| ४. | अ. भा. कारळा संशोधन प्रकल्प, इगतपुरी | ४३५ | ७३ | ९० |
| ५. | अ. भा. पानवेल संशोधन प्रकल्प, डिग्रज राहुरी येथे स्थलांतरीत | ४६५ | ७८ | ९६ |
| ६. | अ. भा. गहू सुधार प्रकल्प, महाबळेश्वर | ४४६ | ७४ | ९३ |
| ७. | अ. भा. मका सुधार प्रकल्प, कोल्हापूर | ८०० | १३३ | १६६ |
| ८. | अ. भा. ऊस संशोधन प्रकल्प, कोल्हापूर | ३६२ | ६१ | ७५ |
| ९. | अ. भा. ऊस संशोधन प्रकल्प, पाडेगांव | ६४० | १०६ | १३३ |
| १०. | अ. भा. गळीतधान्य भुईमुग संशोधन प्रकल्प, डिग्रज | ३८० | ६३ | ० |
| ११. | अ. भा. गुळ व खांडसरी संशोधन प्रकल्प, कोल्हापूर | ४३५ | ७३ | ९० |
| १२. | अ. भा. कोरडवाहू शेती संशोधन केंद्र, सोलापूर | १६२२ | २७० | २५० |
| १३. | अ. भा. कृषि अवजारे विकास प्रकल्प, राहुरी | २८०५ | ४६८ | ५८४ |
| १४. | अ. भा. पुष्प संवर्धन प्रकल्प, पुणे | १००० | १६७ | २०८ |
| १५. | अ. भा. कापूस सुधार प्रकल्प, पुणे | २२२ | ३७ | ४६ |
| १६. | अ. भा. तेलबिया (करडई) सुधार प्रकल्प, सोलापूर | ८२५ | १३७ | १५२ |
| १७. | अ. भा. अळिंबी सुधार प्रकल्प, पुणे | ३९० | ६५ | ८१ |
| १८. | अ. भा. कृषि वेधशाळा प्रकल्प, सोलापूर | ८८५ | १४७ | १७४ |
| १९. | अ. भा. लिंबूवर्गीय फळे सुधार प्रकल्प, राहूरी | ९८५ | १६४ | २०५ |
| २०. | अ. भा. चारा पिके सुधार प्रकल्प, राहुरी | १०१० | १६९ | २१० |
| २१. | अ. भा. राष्ट्रीय बीज उत्पादन तंत्र प्रकल्प | १००० | १६६ | २०८ |

**शासन निर्णय क्रमांक :मफुकृवि-२०१०/प्र.क्र.४९/८-अे, दिनांक ६ डिसेंबर, २०१० सोबतचे**

**विवरणपत्र 'अ'**

**०१ पिक संवर्धन (योजनांतर्गत योजना)**

**सन २०१०-११ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर अनुदान आणि माहे जून २०१० ते डिसेंबर २०१० करिता वितरीत करावयाचे अनुदान.**

**(योजनांतर्गत योजना)**

| अ. क्र. | योजनेचे नांव | सन २०१०-११ करिता मंजूर अनुदान | लेखा अनुदानान्वये माहे एप्रिल २०१० ते मे २०१० करिता वितरीत केलेले अनुदान. | माहे जून २०१० ते डिसेंबर २०१० करिता वितरीत करावयाचे अनुदान. |
|---|---|---|---|---|
| **१.** | **२.** | **३.** | **४.** | **५.** |
| १. | अ. भा. गहू सुधार प्रकल्प, निफाड | ९४४ | १५७ | १९६ |
| २. | अ. भा. गळीतधान्य (भुईमुग) सुधार प्रकल्प, जळगांव | ४२५ | ७१ | ८८ |
| ३. | अ. भा. केळी प्रकल्प, जळगांव | ९०० | १५० | १८७ |
| ४. | अ. भा. कारळा संशोधन प्रकल्प, इगतपूरी | ४३५ | ७३ | ९० |
| ५. | अ. भा. पानवेल संशोधन प्रकल्प, डिग्रज राहुरी येथे स्थलांतरीत | ४६५ | ७८ | ९६ |
| ६. | अ. भा. गहू सुधार प्रकल्प, महाबळेश्वर | ४४६ | ७४ | ९३ |
| ७. | अ. भा. मका सुधार प्रकल्प, कोल्हापूर | ८०० | १३३ | १६६ |
| ८. | अ. भा. ऊस संशोधन प्रकल्प, कोल्हापूर | ३६२ | ६१ | ७५ |
| ९. | अ. भा. ऊस संशोधन प्रकल्प, पाडेगांव | ६४० | १०६ | १३३ |
| १०. | अ. भा. गळीतधान्य भुईमुग संशोधन प्रकल्प, डिग्रज | ३८० | ६३ | ० |
| ११. | अ. भा. गुळ व खांडसरी संशोधन प्रकल्प, कोल्हापूर | ४३५ | ७३ | ९० |
| १२. | अ. भा. कोरडवाहू शेती संशोधन केंद्र, सोलापूर | १६२२ | २७० | २५० |
| १३. | अ. भा. कृषि अवजारे विकास प्रकल्प, राहुरी | २८०५ | ४६८ | ५८४ |
| १४. | अ. भा. पुष्प संवर्धन प्रकल्प, पुणे | १००० | १६७ | २०८ |
| १५. | अ. भा. कापूस सुधार प्रकल्प, पुणे | २२२ | ३७ | ४६ |
| १६. | अ. भा. तेलबिया (करडई) सुधार प्रकल्प, सोलापूर | ८२५ | १३७ | १५२ |
| १७. | अ. भा. अळिंबी सुधार प्रकल्प, पुणे | ३९० | ६५ | ८१ |
| १८. | अ. भा. कृषि वेधशाळा प्रकल्प, सोलापूर | ८८५ | १४७ | १७४ |
| १९. | अ. भा. लिंबूवर्गीय फळे सुधार प्रकल्प, राहूरी | ९८५ | १६४ | २०५ |
| २०. | अ. भा. चारा पिके सुधार प्रकल्प, राहुरी | १०१० | १६९ | २१० |
| २१. | अ. भा. राष्ट्रीय बीज उत्पादन तंत्र प्रकल्प | १००० | १६६ | २०८ |